सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प,टप्पा-२ साठी रू.१.०० कोटी निधी वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय**
**विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कृवपदुम-१९०४६/२१/२०२५/MAG-८A (E-१०५१४२२)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ०७ एप्रिल, २०२५

**संदर्भ :-**

१) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय, क्र.हअप्र-७१६/प्र.क्र.८२/राकृवियो कक्ष, दि.१७ जानेवारी,२०१८
२) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.नादेकृ ४६२२/प्र.क्र.९४/८-अे दि.३०.०६.२०२३
३) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.नादेकृ ४६२४/प्र.क्र.८२/८-अे दि. ०३.०९.२०२४
४) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.नादेकृ ४६२२/प्र.क्र.९४/८-अे दि.१४.१०.२०२४
५) कृषि व पदुम विभाग शासन पत्र क्र.कृयायो-४६२४/प्र.क्र.१०४/८-अे दि.१३.१२.२०२४
६) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.नादेकृ ४६२४/प्र.क.२०४/८-अे दि.०७.०१.२०२५
७) वित्त विभागाचे शासन परिपत्रक, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२५, क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३ दि.०७ एप्रिल, २०२५
८) प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प,मुंबई यांचे पत्र क्र. नादेकृसंप्र-१२२४/ अंदाजपत्रक /प्र.क्र.१२९/लेखा/२६६ दि.२४.०३.२०२५
९) वित्त विशेषज्ञ, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प,मुंबई यांचे पत्र क्र.नादेकृसंप्र-१०२३/ अंदाजपत्रक २४-२५ /प्र.क्र.१९७/२६९, दि.२५.०३.२०२५

**प्रस्तावना :-**

नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाच्या यशस्वीतेमुळे राज्याच्या इतर जिल्ह्यांमधील गावांचा या प्रकल्पामध्ये समावेश करण्याची मागणी विचारात घेऊन दिनांक २८ जून, २०२३ रोजीच्या मा.मंत्रिमंडळाच्या बैठकीत मिळालेल्या मान्यतेनुसार संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये जागतिक बँक अर्थसहाय्यित नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पामध्ये सद्य:स्थितीत समाविष्ट असलेल्या छत्रपती संभाजीनगर, बीड, जालना, परभणी, धाराशीव, लातूर, नांदेड, हिंगोली, अमरावती, अकोला, वाशिम, यवतमाळ, बुलढाणा, वर्धा, जळगाव व नाशिक या १६ जिल्ह्यांसह विदर्भातील उर्वरित नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली अशा एकूण २१ जिल्ह्यांमध्ये अंदाजित रु.६००० कोटी (रुपये सहा

हजार कोटी) किंमतीच्या जागतिक बँक अर्थसहाय्यित नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाचा टप्पा-२ राबविण्यास शासनाची मान्यता देण्यात आली आहे.

संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाच्या टप्पा-२ ची अंमलबजावणी विहित वेळेत व सुरळीत होण्यासाठी तसेच प्रकल्पाचे कार्यालयीन कामकाज सुरळीतपणे सुरु होण्याच्या दृष्टीने प्रकल्प संचालक, प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना विभाग प्रमुख तसेच नियंत्रक अधिकारी व वित्त विशेषज्ञ, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये प्रकल्पाच्या टप्पा-२ मध्ये २१ जिल्हयातील ७२०१ गावे समाविष्ट करण्यात आली असून, प्रकल्पाच्या टप्पा-२ च्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने विविध बाबींना मान्यता देण्याता आली आहे.

संदर्भ क्र.५ येथील शासन पत्रान्वये प्रकल्प टप्पा-२ च्या तयारीकरिता सदयस्थितीत प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, मुंबई येथील ५६ (२१ नियमित ३५ कत्रांटी) पदांना तसेच क्षेत्रिय स्तरावरील ३५ पदांना टप्पा-२ करिता आकृतीबंध मंजून होऊन पदस्थापना होईपर्यंत किंवा माहे ऑगस्ट, २०२५ पर्यंत (जो कालावधी कमी असेल तोपर्यंत) मुदतवाढ देण्यात आली असून, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामधील टप्पा-१ करिता मंजूर अनुदानातून टप्पा-२ च्या पूर्वतयारीच्या अनुषंगाने खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णयान्वये नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाच्या टप्पा-२ करिता वेळोवेळी निधी उपलब्ध करून देण्याकरिता लेखाशिर्षास मान्यता देण्यात आली आहे .संदर्भ क्र.७ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये सन २०२५-२६ साठी महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२५ नुसार मंत्रालयीन प्रशासकीय विभागांचे निधी वितरण निश्चित करण्यात आलेले आहे.

संदर्भ क्र.८ अन्वये प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प यांनी टप्पा २-साठीचा आकृतीबंध मंजूर होईपर्यंत टप्पा १-मधील मुदतवाढ मिळालेल्या पदांच्या वेतनासाठी प्रकल्प टप्पा २-साठी मंजूर करण्यात आलेल्या लेखाशिर्षाद्वारे खर्च करण्यास अनुमती देण्याबाबत विनंती केली आहे. तसेच संदर्भ क्र.९ अन्वये वित्त विशेषज्ञ, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प यांनी प्रकल्पाच्या प्रस्तावित टप्पा-२ च्या पूर्वतयारीच्या अनुषंगाने टप्पा-१ मधील मुदतवाढ देण्यात आलेल्या पदांच्या वेतनावर होणाऱ्या खर्चासाठी निधीची आवश्यकता असल्याचा प्रस्ताव सादर केला आहे. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना प्रकल्पाच्या प्रस्तावित टप्पा-२ करिता रु.१.०० कोटी (अक्षरी रूपये एक कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी प्रकल्पाच्या राज्य हिश्श्याच्या खालील लेखाशिर्षातर्गंत "०१ वेतन" या लेखाउद्दिष्टाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक डी-३,

२४०१ पीक संवर्धन,

(११५) लहान/सीमांत शेतकऱ्यांची आणि शेतमजुरांची योजना,

(००) (०८) नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प टप्पा-२ (हवामान अनुकूल कृषि प्रकल्प टप्पा-२)

(राज्य हिस्सा ३०%) (कार्यक्रम)

(२४०१B५४४)

०१ वेतन

३. या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या निधीचे कोषागारातून आहरण व वितरणाकरिता प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी आणि वित्त विशेषज्ञ, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प टप्पा २-साठीचा आकृतीबंध मंजूर होईपर्यंत अथवा माहे ऑगस्ट, २०२५ पर्यंत (जो कालावधी कमी असेल तोपर्यंत) टप्पा १-मधील मुदतवाढ मिळालेल्या पदांचे वेतन तसेच टप्पा-२ च्या तयारीच्या अनुषंगाने इतर बाबींवरील खर्च प्रकल्पाच्या टप्पा-२ साठीच्या लेखाशिर्षाखालील सन २०२५-२६ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

५. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा विहित पद्धतीने तात्काळ विनियोग करण्यात यावा. तसेच, प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प,

मुंबई यांनी उपरोक्त उद्दिष्टशीर्षाखाली खर्च झालेल्या रकमांचे उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी शासनास सादर करावे.

६. प्रकल्प संचालकांनी सदर प्रकल्पांतर्गत खर्ची पडणाऱ्या निधीची जागतिक बँकेकडून सत्वर प्रतिपूर्ती मिळवावी व मिळालेल्या प्रतिपूर्तीबाबत शासनास वेळोवेळी अहवाल पाठवावा.

७. प्रकल्प संचालकांनी सदर प्रकल्पांतर्गत झालेल्या कामांचा प्रगती अहवाल शासनास वेळोवेळी सादर करावा.

८. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.०७ येथील शासन परिपत्रकानुसार प्रशासकीय विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४०७१६५९३०२५०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT
RAMESH PIMPALE

Digitally signed by PRASHANT RAMESH PIMPALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=fa29ab2a9a96d3a62a7a97531711f1ef9f3e78de039be6cabb44929032069507, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C9FC0E76E90819F7F6D29D043A3E393D7982322683A082D04EDA26B7264E4837, cn=PRASHANT RAMESH PIMPALE
Date: 2025.04.07 17:00:38 +05'30'

**( प्रशांत र.पिंपळे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव (कृषि ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषी संजिवनी प्रकल्प, मुंबई
७. संचालक (नियोजन व प्रक्रिया), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर
९. महालेखापाल (लेखा व अ नुज्ञेयता), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११.निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१२.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई

१३.उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
१४.वित्त विभाग (कार्यासन व्यय-१/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई
१५.नियोजन विभाग (का.१४३१), मंत्रालय, मुंबई
१६.कार्यासन २-अे कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई
१७.मा.मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१८.निवडनस्ती, कार्यासन ८-अे